सन २०१६ च्या खरीप हंगामातील अंतिम पैसेवारी ५० पैशांपेक्षा कमी असलेल्या ६४७ गावांतील बाधित शेतकऱ्यांना कृषी विषयक मदतीसाठी निविष्ठा अनुदानाकरीता निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.
(नाशिक/नागपूर विभाग)

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- एससीवाय-०१/२०१९/प्र.क.०९/म-११**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक- २९ जानेवारी, २०१९.

<u>वाचा</u>:- १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक:-एससीवाय-२०१३/प्र.क्र.२०७/म-७, दिनांक ०३ नोव्हेंबर, २०१५.
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक-एससीवाय-/२०१६/प्र.क्र.५३७/ म-७, दिनांक १० फेब्रुवारी,२०१७.
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक-एससीवाय-२०१६/प्र.क्र.५३७/ म-७, दिनांक २१ जानेवारी,२०१९.

**<u>प्रस्तावना</u> :-**

सन २०१६ च्या खरीप हंगामात अंतिम पैसेवारी कमी असलेल्या ६४७ गावांमध्ये दुष्काळसदृश्य परिस्थिती जाहीर करुन उपाययोजना व मदत जाहीर करण्यात आली होती. त्यानुसार खरीप २०१६ हंगामातील पिक नुकसानीमुळे बाधित झालेल्या शेतकऱ्यांना मदत देताना ज्या शेतकऱ्यांनी प्रधानमंत्री पिक विमा योजनेंतर्गत पिक विमा काढलेला आहे, अशा शेतकऱ्यांना पिकविमा योजनेंतर्गत मंडळनिहाय भरपाईची रक्कम देय असेल त्या रकमेच्या ५०% रक्कम प्रधानमंत्री पिक विमा योजनेत सहभागी नसलेल्या नाशिक व नागपूर विभागातील बाधित शेतकऱ्यांना शासनाकडून मदत देण्याचा निर्णय संदर्भ क्रमांक २ येथील दिनांक १०/०२/२०१७ अन्वये घेण्यात आला. त्यानुसार उपरोक्त संदर्भ क्रमांक ०३ येथील शासन निर्णयान्वये रुपये २६,१९,९६,६०२/- (अक्षरी सव्वीस कोटी, एकोणीस लाख, शहाण्णव हजार, सहाशे दोन फक्त) इतका निधी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने नाशिक/ नागपूर विभागास अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

सन २०१६ च्या खरीप हंगामात अंतिम पैसेवारी कमी आलेल्या ६४७ गावांमध्ये दुष्काळसदृश्य परिस्थिती जाहीर करुन उपाययोजना व मदत जाहीर करण्यात आली होती.

त्यानुसार खरीप २०१६ हंगामातील पिक नुकसानीमुळे बाधित झालेल्या शेतकऱ्यांना मदत निधी वाटप करिता खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे विभागीय आयुक्त, नाशिक व नागपूर विभागाकरीता एकूण रुपये २६,१९,९६,६०२/- (अक्षरी सव्वीस कोटी, एकोणीस लाख, शहान्नव हजार, सहाशे दोन फक्त) इतका निधी ह्या शासन निर्णयान्वये अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर (Beams) उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| विभाग | जिल्हा | वितरीत करावयाचानिधी (रुपये अंकात) | एकुण |
|---|---|---|---|
| **नाशिक** | धुळे | १७,६७,००,११३ | |
| | नंदुरबार | ४,६०,५१,०८३ | |
| | अहमदनगर | २,५३,२२,१८८ | |
| | | **एकुण नाशिक** | **२४,८०,७३,३८४** |
| **नागपूर** | भंडारा | ५७,४३,९२० | |
| | चंद्रपूर | ८१,७९,२९८ | |
| | | **एकुण नागपूर** | **१,३९,२३,२१८** |
| | | **एकूण** | **२६,१९,९६,६०२** |

२. विभागीय आयुक्त,नाशिक/नागपूर यांना जिल्हावार निधीचे वाटप करण्याकरीता रुपये २६,१९,९६,६०२/- (अक्षरी सव्वीस कोटी, एकोणीस लाख, शहान्नव हजार, सहाशे दोन फक्त) इतक्या निधीचे वाटप करण्यात येत आहे. हा निधी सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात "मागणी क्रमांक सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्ती निवारणार्थ सहाय्य (योजनेत्तर), ०१ अवर्षण, १०१ अनुग्रह सहाय्य, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकांनुसार खर्च, (९१) (०५) पीक नुकसानीमुळे शेतकऱ्यांना मदत, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर), (२२४५ २४३४) या उपलेखाशिर्षाखाली " अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीतून विभागीय आयुक्त, नाशिक/नागपूर यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणाली (BDS) वर उपलब्ध करुन देण्यात येत आहे, या शीर्षाखाली तो अंतीमत: खर्ची दाखविण्यात यावा. वर नमूद केलेल्या तक्त्याप्रमाणे निधी वाटपाच्या मर्यादेतच संबंधित जिल्ह्यांना निधी वितरीत होईल, याची कृपया दक्षता घ्यावी.

३. निधीच्या वाटपासंदर्भात सर्वसाधारण मार्गदर्शक सूचना उपरोक्त संदर्भ क्रमांक २ व ३ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे राहतील.

४. अर्थसंकल्पिय वितरण प्रणाली (BDS) वर उपलब्ध निधी अनावश्यक रितीने कोषागारात आहरीत करुन तो वाटपा अभावी बँकेत पडून राहणार नाही, याची काटेकोर दक्षता घेण्याचे आदेश

वेळोवळी देण्यात आलेले आहेत. असे असतानाही कोषागारातून रक्कम आहरीत करुन बँकेत ठेवले असल्याच्या बाबी निदर्शनास आल्या आहेत. यास्तव
निधी आहरीत करुन बँकेत ठेऊ नये, अशा सक्त सूचना या शासन निर्णयान्वये पुन:श्च देण्यात येत आहेत. अशी बाब आढळून आल्यास त्याला तात्पुरता अपहार समजून, संबंधितांवर शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल, याची सर्वांनी नोंद घ्यावी.

५. नैसर्गिक आपत्तीमध्ये बाधित व्यक्तींना वाटप करण्यासाठी वितरित करण्यात येणारा निधी तालुकास्तरावरील आहरण व संवितरण अधिकारी यांचेकडून लाभार्थ्यांच्या बँक खात्यामध्ये हस्तांतरित केला जातो. काही बँका लाभार्थ्यांचे नाव, खाते क्रमांक जुळत नाही अशा तांत्रिक कारणास्तव परत आलेला निधी निलंबन (Suspense)खात्यात ठेवतात. वास्तविक पाहता बँकाकडे वर्ग करण्यात आलेली रक्कम एकतर लाभार्थ्यांच्या खात्यात जमा होणे आवश्यक आहे किंवा परत आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या खात्यात जमा होणे आवश्यक आहे. तथापि, आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या खात्यात अशा रकमा जमा करण्याऐवजी बँका त्या निलंबन खात्यामध्ये ठेवतात. कालांतराने अशा रकमा ताळमेळविना राहतात आणि ज्या रकमा शासनाकडे परत जमा व्हावयास हव्या त्या बँकाकडे पडून राहतात. याला आळा घालण्यासाठी ठराविक कालावधीने सदर रकमांचा ताळमेळ घेणे अत्यंत गरजेचे आहे. तरी सर्व आहरण व संवितरण अधिकारी यांनी दर आठवडयाला यापूर्वी वर्ग करण्यात आलेल्या व यानंतर वर्ग करण्यात येणाऱ्या रकमांचा ताळमेळ घेण्याची कार्यवाही करावी.

६. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे याची विभागीय आयुक्त,नाशिक/नागपूर यांनी खातरजमा करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख/नोंदवहया विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरित व वितरीत करणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अदयावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दरमहा होणाऱ्या प्रत्यक्ष खर्चाचे पत्र पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यत विभागीय आयुक्त,नाशिक/नागपूर यांनी एकत्रित महसूल व वन विभागास न चुकता सादर करावी. दर तीन महिन्यांनी झालेल्या खर्चाची महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाची पडताळणी करुन त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

७. नियंत्रक अधिकाऱ्यांनी अनुदान वाटपाची एक प्रत अ.मु.स. (मदत व पुनर्वसन) यांना न चुकता सादर करावी. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार/उप कोषागार यांच्याकडे पाठविण्यात येणाऱ्या बिलासोबत जोडल्या जाणाऱ्या संगणक चिठ्ठीमध्ये गौण / उपशिर्षाच्या "संगणक यंत्र" संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा, असे आदेश कृपया संबंधित अधिकाऱ्यांना नियंत्रण अधिकाऱ्यांनी दयावेत. तसेच कोषागारातून/उप कोषागारातून आहरित केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

८. राज्य निवडणूक आयोगाने आदेश क्रमांक: रानिआ/ग्रापंवि-२०१८/प्र.क्र.१९/का.८, दिनांक २३.१.२०१९ अन्वये राज्यातील २६४ ग्रामपंचायतींच्या सार्वत्रिक निवडणूकांचा कार्यक्रम घोषित केला आहे. त्यामुळे या निवडणूकांच्या कार्यक्रमामुळे आदर्श आचारसंहिता लागू झालेल्या ग्रामपंचायतीच्या क्षेत्रामध्ये मदतीचे वाटप करू नये. यासंदर्भात संबंधित जिल्हाधिकारी यांनी राज्य निवडणूक आयोगाची मान्यता प्राप्त करून घ्यावी व त्यांनी मान्यता दिल्यानंतरच संबंधित ग्रामपंचायतीच्या क्षेत्रामध्ये मदतीचे वाटप करण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०२१२४३३६१८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJASHREE MILIND RAUT

Digitally signed by RAJASHREE MILIND RAUT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=58e3cf7b9657c2ed6d6d47f01918bccb8dca ac1f1b6f31c7c723db4deb16f5f2, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=6689500497ea8c2084eb7b303b8b2f3 922ec7b73b6347d04e043dc0b8ef0fd64, ou=REVENUE AND FOREST, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAJASHREE MILIND RAUT
Date: 2019.02.02 12:46:00 +05'30'

**( राजश्री राऊत )**
**वित्तीय सल्लागार व सह सचिव**

**प्रति,**

१) मा.मंत्री (म. व पु.) यांचे खाजगी सचिव,
२) मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
३) अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक,
४) अप्पर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहाय्यक,
५) अप्पर मुख्य सचिव (म.व पु.) यांचे स्वीय सहाय्यक,
६) विभागीय आयुक्त, नाशिक/नागपूर
७) संबंधित जिल्हाधिकारी.
८) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
९) महालेखापाल-१/२(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षण),महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
१०) संचालक, लेखा व कोषागारे,महाराष्ट्र राज्य,मुंबई-४०००२३.

११) अधिदान व लेखाधिकारी, वांद्रे (पूर्व) , मुंबई -४०० ०५१.
१२) निवासी लेखाधिकारी, मुंबई.
१३) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई
१४) वित्त विभाग (अर्थसंकल्प-४/६/ व्यय-९/अर्थोपाय कक्ष/वित्त आयोग कक्ष), मंत्रालय, मुंबई
१५) कार्यासन अधिकारी (ब-१/म-३/म-७/पीएसी/पीएसी-१ कार्यासने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) निवडनस्ती, कार्यासन म-११, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.